**स्पर्श ग्रामीण रूग्णालय, सास्तुर, जि. उस्मानाबाद या संस्थेस अनुदान मंजूर करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः प्राईड-२०२१/ प्र.क्र.२४६/ आरोग्य-४

मंत्रालय, १० वा मजला, संकुल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
दिनांक : २४ नोव्हेंबर, २०२१.

वाचा :-

(१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग., क्रमांकः आरएलएच-२७९६/१४५२/प्र.क्र.२४६/ आरोग्य-४, दि.२६.०६.२०००.
(२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग., क्रमांकः प्राईड-२०१०/ प्र.क्र.९९/ आरोग्य-४, दि.२३.०९.२०१२.
(३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग., क्रमांकः प्राईड-२०१०/ प्र.क्र.९९/ आरोग्य-४, दि.३१.०१.२०१९.
(४) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग., क्रमांकः प्राईड-२०१०/ प्र.क्र.१०३/ आरोग्य-४, दि.२१.१२.२०२०.
(५) सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र, क्रमांकः संआसे /कक्ष३/ टे-२/व्हीआयपी/न.क्र.८/सास्तुर/१५८५१/५३/२१, दि.१५.०९.२०२१.

प्रस्तावना :-

स्पर्श ग्रामीण रुग्णालय शासकीय ग्रामीण रुग्णालयाच्या धर्तीवर चालविले जाते. प्राईड इंडिया संस्थेने स्पर्श ग्रामीण रुग्णालय, सास्तूर, जि. उस्मानाबाद या संस्थेशी संदर्भाधिन अनुक्रमांक १ व २ च्या शासन निर्णयानुसार केलेल्या संस्थेशी सामंजस्य करारानुसार सन २०२०-२१ या वर्षातील अनुदान रु.१,१९,९७,२००/- इतके मंजूर करण्याबाबतचा आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. यासंदर्भात पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

शासन निर्णय :-

स्पर्श ग्रामीण रुग्णालय शासकिय ग्रामीण रुग्णालयाच्या धर्तीवर चालविले जाते. सन २०२०-२१ या वर्षातील अनुदान रु. १,१९,९७,२००/- (रुपये एक कोटी, एकोणीस लाख, सत्याण्णव हजार, दोनशे फक्त) इतके अनुदान अदा करण्यास उपरोक्त क्र.(१) व (२) येथील दि.२६.०६.२००० व

दि.२३.०९.२०१२ च्या शासन निर्णयांमधील अटी व शर्तीच्या अधिन राहून प्रशासकीय व वित्तिय मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत प्रयोजनार्थ होणारा खर्च मागणी क्रमांक - आर-१, मुख्यलेखाशिर्ष "२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१ - नागरी आरोग्य सेवा - विषम चिकित्सा ग्रामीण आरोग्य सेवा, ११० - रुग्णालये व दवाखाने, ११० (४) - मुफसल रुग्णालये व दवाखाने यांना सहाय्यक अनुदान, (०३)(०१) अध्यापनेतर रुग्णालये व दवाखाने यांना सहाय्यक अनुदान (२२१० ०१७३), ३१ - सहाय्यक अनुदाने" या लेखाशीर्षांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. प्रस्तुत तरतूद उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर यांच्या अधिनस्त ठेवण्याबाबतची कार्यवाही सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थसंकल्प व प्रशासन ), पुणे यांनी करावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील भाग-पहिला, उपविभाग-तीन मधील अनुक्रमांक ४, परिच्छेद क्र.२७ (२) (ब) अन्वये प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११२२१३३९२९५४१७ हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DEEPAK NIVARTTI KENDRE

Digitally signed by DEEPAK NIVARTTI KENDRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=40fdba39a26dd429d5be80f9cd769 98906ed5012a776fbe5072661d97c2c56c9, pseudonym=BF4C0C742439A64408C0621C D1FF33CD1AD8C6B9, serialNumber=C351F74FB3439ACA71466FC FBB2509C3310AE753E395A89FFA7C6E3887 B0AADF, cn=DEEPAK NIVARTTI KENDRE
Date: 2021.11.24 17:29:57 +05'30'

**(दी.नि.केंद्रे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, (लेखापरिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर.
२. संचालक, आरोग्य सेवा-१, आरोग्य सेवा आयुक्तालय, आरोग्य भवन, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा-२, आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
४. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (कुटूंब कल्याण, माता बालसंगोपन व शालेय आरोग्य),पुणे.

५. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), आरोग्य सेवा आयुक्तालय मुंबई.
६. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ), आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
७. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन ), पुणे.
८. उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर.
९. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रूग्णालय, उस्मानाबाद.
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर/उस्मानाबाद.
११.प्रकल्प अधिकारी, प्राईड इंडिया स्पर्श ग्रामीण रूग्णालय, सास्तुर, ता.लोहारा, जि.उस्मानाबाद.
१२.वित्त विभाग (विनियम), मंत्रालय, मुंबई.
१३.अवर सचिव (अर्थसंकल्प), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१४.निवडनस्ती( आरोग्य-४ ), सा.आ.वि.